**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील मुख्य अभियंता (स्था.) हे पद जलसंपदा विभागातील अभियंत्यांमधून प्रतिनियुक्तीने भरणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा-११२१/प्र.क्र.१८८/पापु-२३**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २२ फेब्रुवारी, २०२२

वाचा - १) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पत्र क्र. मजीप्रा २०१९ (२८)/जल.वि/अअ-काअ (या)/प्रतिनी/आस्था-१ दि. ०९.११.२०१९
२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पत्र क्र. मजीप्रा/२०१९(३४)/मु.पदो/आ-१ दि.०१/०२/२०२१
३) जलसंपदा विभाग पत्र क्र. प्रतिनि १३२१/प्र.क्र.२६७/ आ.(वर्ग-१) दि.१२/१०/२०२१

**शासन आदेश -**

०१. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गाची पदे मोठ्या प्रमाणावर रिक्त असल्यामुळे व या पदावरील पदोन्नतीसाठी प्राधिकरणामध्ये पात्र अधिकारी उपलब्ध नसल्याने ही पदे जलसंपदा विभागाकडील अधिका-या मार्फत प्रतिनियुक्तीने भरण्याची विनंती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधीन (१) व (२) च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुषंगाने जलसंपदा विभागातील अधिका-यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याचा प्रस्ताव त्या विभागाने संदर्भाधीन (३) पत्रान्वये या विभागाकडे सादर केला आहे.

०२. जलसंपदा विभागातील खालील अधिका-यांना पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अखत्यारितील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | पदनाम | प्राधिकरणामध्ये द्यावयाची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. राजेंद्र अ. काटपल्लीवार | मुख्य अभियंता (स्था.) | मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर |

०३. या अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे असतील.

०४. जलसंपदा विभागाने वाचा येथील अ.क्र. ३ येथील पत्रान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यास सहमती दर्शवली असल्याने उपरोक्त अभियंत्यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर नियुक्ती स्वीकारण्यासाठी जलसंपदा विभागाने त्वरित कार्यमुक्त करावे.

०५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधीकरण यांनी उपरोक्त अभियंत्यांना दर्शविलेल्या प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु करून घ्यावे व रुजु अहवाल पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास तसेच जलसंपदा विभागास पाठवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२२१११०२१४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.02.22 11:23:05 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री. राजेंद्र अ. काटपल्लीवार, मुख्य अभियंता तथा मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद.

प्रत:-

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

२) सहसचिव/उपसचिव (सर्व), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

३) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

६) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

८) कार्यकारी अभियंता (ग्रापापु), जिल्हा परिषद (सर्व)

९) कक्ष अधिकारी/अवर सचिव (सर्व), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती, पापु-२३

प्रत माहितीस्तव,

१) मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अप्पर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

## परिशिष्ट

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्रमांक- मजीप्रा-११२१/प्र.क्र.१८८/पापु-२३
दिनांक - २२ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र,

प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती :

१. प्रतिनियुक्तीचा कालावधी :- संबंधित अधिकारी ज्या तारखेला शासकीय सेवेच्या पदाचा कार्यमार सुपूर्द करतील त्या तारखेपासून स्वीयेतर सेवा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला समाप्त होईल, परंतु,

( एक ) जर अधिकाऱ्याची सेवा लोकसेवेच्या हितास्तव शासनाला आवश्यक वाटली तर त्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन राखून ठेवील.

( दोन ) जर अधिकाऱ्याची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विमागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र त्याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला ३ महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

( तीन ) संबंधित अधिकाऱ्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत घेण्याची मुभा राहील.

२. वेतन :- संबंधित अधिकाऱ्यांनी स्वीयेतर सेवेत असतांना सर्वसाधारण नियमानुसार प्रतिनियुक्तीच्या पदाचे वेतन निश्चित करुन घ्यावे किंवा जर त्यांची स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्ती झाली नसती तर त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या लगतपूर्वी जे पद धारण केले होते त्या पदाकरीता विहित केलेल्या वेतनश्रेणीमध्ये मूळ विभागामध्ये जे वेतन घेतले असते ते वेतन अधिक प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय राहील.

३. महागाई भत्ता :- संबंधित अधिकारी राज्य शासनाकडे आपले वेतनमान कायम ठेवतील किंवा स्वीयेतर सेवेतील पदांना संलग्न असणाऱ्या वेतनमानात वेतन घेतील, त्याप्रमाणे त्यांना राज्य शासनाकडे किंवा स्वीयेतर नियोक्त्याकडे नियमानुसार अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता मिळण्यास हक्क असेल,

४. घरभाडे भत्ता / स्थानिक पूरक भत्ता :- संबंधित अधिकाऱ्यांना राज्य शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे घरभाडे भत्ता, स्थानिक पुरक भत्ता घेण्याचा हक्क असेल पण स्वीयेतर नियोक्ता स्वेच्छा निर्णयानुसार स्वीयेतर सेवेच्या नियमान्वये हे भत्ते मंजूर करु शकेल.

५. पदग्रहण अवधी वेतन व बदली प्रवास भत्ता :- स्वीयेतर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवासभत्ता राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार स्वीयेतर नियोक्त्यांकडून देण्यात येतील,

६. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता :- अधिकारी स्वीयेतर सेवेत रुजू झाल्यानंतर कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा स्वीयेतर नियोक्त्याच्या नियमान्वये प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

७. रजा :- अशा बदलीपूर्वी संबंधित अधिकाऱ्यांना लागू असलेले रजेचे नियम बदलीनंतरही त्यांना लागू राहतील. महाराष्ट्र नागरी सेवा ( रजा ) नियम १९८१ च्या नियम १८ ( २ ) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेतर सेवेतून मुक्त झाल्यानंतर त्यांना परस्पर रजेवर जाण्यास स्वीयेतर नियोक्त्याने परवानगी देता कामा नये; म्हणजेच प्रथम त्यांना शासकीय सेवेत रुजू होऊन मूळ विभागातील सक्षम प्राधिकाऱ्यांकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहिजे.

८. स्वीयेतर सेवेच्या दरम्यान किंवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या कोणत्याही पूरक भत्त्यांच्या संबंधातील संपूर्ण खर्च स्वीयेतर नियोक्त्याला सोसावा लागेल.

९. विकलांगता रजेबद्दल रजा वेतन : - स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करता येईल अशा रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्यीयेतर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुद्धा रजा घेतन देण्यास स्थीयेतर नियोक्ता जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च स्वीयेतर नियोक्त्याकडून वसूल करण्यात येईल.

१०. रजा मुदती प्रवास सवलत : - या विषयावरील राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये शासकीय कर्मचा याला रजा मुदती प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल, या संबंधातील खर्च स्वीयेतर नियोक्त्याला सोसावा लागेल.

११.वैद्यकीय सवलती : - शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा ( वैद्यकीय उपचार ) नियम १९६१ अनुसार अनुज्ञेय असणाऱ्या वैद्यकीय सुविधा मिळण्याचा हक्क असेल आणि त्यावरील खर्च स्वीयेतर नियोक्त्याला सोसावा लागेल,

१२. सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधीची वर्गणी : - शासकीय कर्मचारी विहित नियमानुसार भविष्य निर्वाह निधीचा वर्गणीदार असेल त्याच निधीला वर्गणी देणे पुढे चालू ठेवील,

१३. विभागीय चौकशी : - जर शासकीय कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल तर त्याला त्याच्या मूळ विभागाकडे पाठविण्यात येईल. शासन त्याला निर्वाह भत्ता देईल, पण तो स्वीयेतर नियोक्त्याकडून वसुल करण्यात येईल.

१४. गट विमा योजना लागू करणे : - स्वीयेतर नियोक्त्याने संबंधित अधिकाऱ्याकडून राज्य शासकीय गट विमा योजना अंतर्गत आवश्यक अशी वसुली दरमहा करावी व ती " ८११ विमा आणि निवृत्ती वेतन निधी, इतर विमा आणि निवृत्तीवेतन निधी, राज्य शासकीय गट विमा योजना" या लेखाशीर्षाखाली भरावी.